आयुक्त्, दिव्यांग कल्याण पुणे यांना निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकआ-२०२१/प्र.क्र. २२६/आस्था-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २० एप्रिल, २०२३

**वाचा :**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सकआ-२०१०/प्र.क्र.५०/आस्था-२, दि २५.०५.२०१०
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-२०१७/प्र.क्र. ४१/१७/विनियम, दि. २८.०७.२०२०
३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे पत्र क्र. दिकआ/रवका/नवीन वाहन मंजूरी/प्रस्ताव/२०२२-२३/१२५३, दि. २७.०५.२०२२

**प्रस्तावना :**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या माध्यमातून मागासवर्गीयांच्या कल्याणासाठी अनेकविध योजना राबविण्यात येतात. या योजनांची परिणामकारक व प्रभावीपणे अंमलबजावणी व्हावी याकरिता या योजनेचे प्रत्यक्ष लाभार्थी तसेच वैयक्तीक लाभार्थी यांना प्रत्यक्ष भेटी देणे आवश्यक असते. त्यासाठी या योजना राबविण्याची व त्यावर नियंत्रण ठेवण्याची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ज्या पदांकडे सोपविण्यात आल्या आहेत अशा पदांकरिता वाहन सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. याअनुषंगाने विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अधिकाऱ्यांना वाहन अनुज्ञेय करण्यात आली आहेत.

आयुक्त, दिव्यांग कल्याण पुणे यांचेसाठी मंजूर असलेले वाहन क्र. एमएच-१२ एएच ९०१८ हे वाहन निर्लेखित करण्यात आले आहे. सदर वाहनाबदली आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांना नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी सादर केला आहे. सदर प्रस्तावास मंजूरी देण्याचीबाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचेकडील वाहन क्र. एमएच-१२ एएच-९०१८ या निर्लेखित वाहनाबदली एक वाहन रु. १०.०० लाख किमंत मर्यादेत नवीन वाहन खरेदी करण्यास व तद्प्रत्यर्थ येणाऱ्या रु. १०.०० लक्ष (रुपये दहा लाख फक्त) च्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

१) निधी उपलब्धते अनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक वाहन-२०१७/प्र.क्र. ४१/१७/विनियम, दिनांक २८.०७.२०२० मधील तरतुदींच्या अनुषंगाने आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांना रु. १०.०० लाखाच्या कमाल मर्यादत (वाहनाची किमंत + वस्तू व सेवा कर + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मुल्यवर्धित कर + सहाय्यभूत साहित्य Accessories इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावे.

२) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भाखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग- उद्योग-४ दि. ०१.१२.२०१६ व क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २१५/ उद्योग-४, दि. २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३) वाहन क्र. एमएच-१२ एएच-९०१८ या निर्लेखित वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहने खरेदी करण्यात आले नाही या अटीच्या अधिन राहून नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देत आहे.

४) ज्या अधिकाऱ्यांसाठी वाहन खरदी केले आहे त्या अधिकाऱ्यासच त्या वाहनाचे वाटप करावे व वाहन हस्तांतरित करता येणार नाही.

२. सदरचा खर्च २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाज कल्याण, ००१ संचालन व प्रशासन (०१) दिव्यांग कल्याण आयुक्तालय, (०१) (०१) दिव्यांग कल्याण आयुक्तालय (अनिवार्य) (२२३५सी ९७६) ५१ मोटार वाहने या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.८९/२०२३/विनियम, दि. ३१.०३.२०२३ आणि राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२११३४००१९०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2023.04.21 13:50:09 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
२. उप आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५. सह सचिव /उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई
६. निवड नस्ती आस्था-२.